राज्य वेतन सुधारणा समिती, २००८
अतिउकृष्ट कामासाठी आगाऊ वेतनवाढी
मंजूर करण्यासंदर्भातील सामान्य प्रशासन
विभागाचा शासन निर्णय जिल्हा परिषद
कर्मचाऱ्यांना लागू करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- जिपआ-२०२२/प्र.क्र.३५९/आस्था-४**
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई
दिनांक :- १८ एप्रिल, २०२३

**वाचा** :-

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक न्यायाप्र-२५२१/प्र.क्र. ३५/ का.८, दिनांक १५ डिसेंबर, २०२२

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक आवेवा-१००९/प्र.क्र.८७/०९/आठ, दिनांक ३-७-२००९

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक आवेवा-२००९/प्र.क्र.४६/का.आठ, दिनांक २४- ८-२०१७

४) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन आदेश क्रमांक डिएसआर-२००८/प्र.क्र.७९/आस्था-५, दिनांक १२-६-२००८

५) ग्राम विकास विभाग, शासन पृष्ठांकन क्रमांक डिएसआर-२०२०/प्र.क्र.०५/आस्था-५, दिनांक २० जानेवारी, २०२०

**प्रस्तावना :-**

ग्राम विकास विभागाच्या संदर्भ क्र. ४ च्या शासन आदेशान्वये राज्यातील जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांना ऑक्टोबर, २००६, २००७ व २००८ या वर्षाच्या आगाऊ वेतनवाढी मंजूर केलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांची सुधारित वेतनश्रेणीत वेतन निश्चिती करण्याबाबत आदेश निर्गमित करण्यात आले होते.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक आवेवा-१००९/प्र.क्र.८७/०९/आठ, दिनांक ३-७-२००९ आणि सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक आवेवा-२००९/प्र.क्र.४६/का.आठ, दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ अन्वये राज्यातील अधिकारी/कर्मचारी यांना अतिउकृष्ट कामासाठी आगाऊ वेतनवाढी मंजुर करण्यात येवू नयेत असा निर्णय घेण्यात आला होता.

३. त्यानुसार ग्राम विकास विभागाच्या संदर्भ क्र. ५ च्या शासन पृष्ठांकनान्वये राज्यातील जिल्हा परिषदांमधील अधिकारी/कर्मचारी यांना अतिउकृष्ट कामासाठी आगाऊ वेतनवाढी मंजुर न करण्याचे सामान्य प्रशासन विभागाचे निर्देश सर्व जिल्हा परिषदांना प्रसृत करण्यात आले.

४. परंतू सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयांच्या विरोधात मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल झालेल्या रिट पिटीशन क्रमांक ११००४/२०१९ मध्ये , मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशास अनुसरुन सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र. १ चा शासन निर्णय राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना लागू केला आहे.

५. राज्यातील जिल्हा परिषदांमधील कर्मचारी हे स्थानिक स्वराज्य संस्थेचे कर्मचारी असून राज्य शासकीय कर्मचारी नाहीत. त्यामुळे राज्यातील जिल्हा परिषदांमधील कर्मचाऱ्यांना शासनाचे कोणतेही नियम, अधिनियम, शासन निर्णय, शासन परिपत्रक इत्यादी थेट लागू होत नाही आणि लागू करावयाचे असल्यास ग्राम विकास विभाग स्वतंत्र आदेश काढून सदर बाबी जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांना लागू करतो. त्यामुळे संदर्भ क्र. १ चा शासन निर्णय राज्यातील जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांना लागू करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे शासन परिपत्रक प्रसृत करण्यात येत आहे.

**शासन परिपत्रक :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक न्यायाप्र-२५२१/प्र.क्र. ३५/ का.८, दिनांक १५ डिसेंबर, २०२२ ,राज्यातील सर्व जिल्हा परिषदांमधील सर्व अधिकारी/कर्मचारी यांना लागू करण्यात येत आहे.

२. सर्व जिल्हा परिषदांनी सदर प्रकरणी तात्काळ कार्यवाही करुन, संपूर्ण राज्यभरात आगाऊ वेतनवाढीच्या अनुषंगाने चालू असलेल्या न्यायालयीन प्रकरणांमध्ये मा.न्यायालयास उपरोक्त वस्तुस्थिती लक्षात आणू देण्यात यावी व सदर न्यायालयीन प्रकरणे निकाली काढण्याची मा. न्यायालयास विनंती करण्यात यावी.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०४१८१७३०४४६९२० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार

Digitally signed by PATIL PRASHANT VINAYAKRAO
Date: 2023.04.18 17:46:02 +05'30'

**( प्रशांत वि. पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

२. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

३. मा.विरोधी पक्ष नेता, ( विधानसभा/विधान परिषद ), विधानमंडळ, मुंबई

४. मा.मंत्री ( ग्राम विकास विभाग ), मंत्रालय, मुंबई

५. अप्पर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंंत्रालय, मुंबई

६. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

७. अप्पर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई

८. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य ,मुंबई/नागपूर

९. महालेखापाल, ( लेखा परिक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंंबई / नागपूर

१०.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

११.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१२.निवासी लेखा अधिकारी, मुंबई

१३.सर्व विभागीय आयुक्त,

१४.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद

१५.सर्व उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई

१६.सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई

१७.मुख्य सरकारी वकिल, अपील शाखा, रिट सेल, मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद/नागपूर

१८. मुख्य सरकारी वकिल, अपील शाखा, रिट सेल, मा.उच्च न्यायालय, मुुंबई

१९. कार्यासन आस्था-४ संग्रहार्थ.